**सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता भागभांडवली अंशदान अनुदान मंजूर करण्याबाबत.**
**वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित)**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वनाम -२०२३/प्र.क्र.२८/महामंडळे**
मोतीमहल खोली क्र. २ दुसरा मजला,
१९५ जे.टाटा मार्ग, चर्चगेट, मुंबई-४०० ०२०
दिनांक : ३१ मार्च, २०२३.

**संदर्भ** :-१. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाचे पत्र क्र. वनाविजाभज -२०२२-२३/अधि.भाग.भां./प्र.क्र.०३ /वि.व ले., दि.१६.०३.२०२३

## शासन निर्णय

वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचे मार्फत विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग यांच्या आर्थिक उन्नतीसाठी विविध योजना राबविण्यात येतात. वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळाचे अधिकृत भागभांडवल रु. २००.००/- कोटी (अक्षरी रू. दोनशे कोटी फक्त) असून त्यापैकी सन २०१८-२०१९ पर्यंत रू. १९९.३५/- कोटी (अक्षरी रू. एकशे नव्याण्णव कोटी पस्तीस लक्ष फक्त) एवढे भागभांडवली अंशदान सदर महामंडळास वितरीत करण्यात आलेले आहे व शिल्लक भागभांडवल रु.६५.००/- लक्ष (अक्षरी रू.पासष्ट लक्ष फक्त) इतके आहे. सन २०२२- २३ या आर्थिक वर्षाकरिता लेखाशिर्ष ४२२५ १९२२ अंतर्गत सुधारित अर्थसंकल्पिय तरतुदी नुसार रू.५२.००/- लक्ष (अक्षरी रू. बावन्न लक्ष फक्त) इतके भागभांडवली अंशदान मंजुर करण्यात आले आहेत.

वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळास सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात मंजूर सुधारित अर्थसंकल्पीय तरतूद रु. ५२.०० लक्ष (रू. बावन्न लक्ष फक्त) इतके भागभांडवल वितरीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**१.** वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळाकडे बीज भांडवल कर्ज योजना व रू.१,००,०००/- थेट कर्ज योजना या अंतर्गत प्राप्त कर्ज प्रस्तावांना कर्ज वितरीत करण्याकरिता रु.५२,००,०००/- (रू बावन्न लक्ष फक्त) भागभांडवली अंशदानाची रक्कम खर्च करण्यात यावी. तसेच वरील प्रमाणे रक्कम अदा केल्यानंतर त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.
**२.** भागभांडवली अंशदानाच्या निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत.
**३.** व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
**४.** महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.

**३.** वरील अनुदानाबाबत उप सचिव (अर्थसंकल्प) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी, कक्ष अधिकारी (रोखशाखा), आहरण व संवितरण अधिकारी, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांना सदर अनुदान म. को.नि. ४४ मधील नमुन्यातील देयकान्वये वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित), मुंबई यास संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

**४.** या बाबीवरील खर्च मागणी क्र. झेडजी -४, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका (०१) भागभांडवली अंशदान, (०१) (०१) वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (आणि विशेष मागासप्रवर्गासाठी योजना) (कार्यक्रम) ३२, अंशदाने ५४, गुंतवणूका,(४२२५१९२२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागवावा.

**५.** हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४३७/२०/व्यय-१४, दि. ३१/०३ /२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४०३१५५५०५८७४३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIVEDITA
LOKESH WARULE

Digitally signed by NIVEDITA LOKESH WARULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=3ef8c2c4c081462a26dea72c10274caaa77d92363242a1bff9454421d88652f3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8A41558A05225BDD429CBDFA69D2436A1EA3BC5173099C377F9F8B13C78A9D57, cn=NIVEDITA LOKESH WARULE
Date: 2023.04.03 15:57:06 +05'30'

**( नि. लो. वारूळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई.
७) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
८) कक्ष अधिकारी (रोखशाखा / अर्थसंकल्प), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती (महामंडळे).